श्री. विलास तुकाराम मुसळे, सहायक जिल्हा पुरवठा अधिकारी, परभणी यांच्याकडे जिल्हा पुरवठा अधिकारी, परभणी या रिक्त पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन आदेश क्र.: -अतिका ३१२५ /प्र.क्र. ४१/ना.पु.१५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक १८ मार्च, २०२५.**

**संदर्भ:-** १) महाराष्ट्र नागरी सेवा वेतन (नियम), १९८१ मधील नियम, ५६.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. वेतन १३११/प्र.क्र. १७/सेवा-३, दि.२७.१२.२०११.
३) शासन परिपत्रक, सा.प्र.वि., क्र.एस आरव्ही-२०१८/प्र.क्र.२०८/कार्या.१२, दि.०५.०९.२०१८.
४) शासन अधिसूचना, अ.ना.पु. व ग्रा.सं.वि., क्र. सेपनि-१२२०/प्र.क्र.१४०/ना.पु.१५, दि.२७.०३.२०२३.
५) शासन आदेश, अ.ना.पु.व ग्रा.सं.वि., क्र.पदोन्न-२०२३/प्र.क्र.२०४/ना.पु.१५, दि.२५.०१.२०२४.

**शासन आदेश:-**

संदर्भ क्र.३ येथील सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक दि.०५.०९.२०१८ अन्वये अतिरिक्त कार्यभार सोपविण्यासंदर्भातील मार्गदर्शक सूचना व तरतुदी विचारात घेऊन प्रशासकीय कारणास्तव पुरवठा यंत्रणेतील **श्री. विलास तुकाराम मुसळे, सहायक जिल्हा पुरवठा अधिकारी, परभणी** यांच्याकडे **जिल्हा पुरवठा अधिकारी, परभणी** या रिक्त पदाचा **अतिरिक्त कार्यभार** पुढील शासन आदेश होईपर्यंत सोपविण्यात येत आहे.

२. श्री. विलास मुसळे यांनी त्यांच्या मुळ पदाच्या कर्तव्य व जबाबदारीसह जिल्हा पुरवठा अधिकारी, परभणी या पदाची कर्तव्ये व जबाबदारी पार पाडण्याची खबरदारी घ्यावी.

३. श्री. विलास मुसळे, सहायक जिल्हा पुरवठा अधिकारी, परभणी यांनी जिल्हा पुरवठा अधिकारी, परभणी या पदाचा अतिरिक्त कार्यभार तात्काळ धारण करावा.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३१८१७४८३४८००६ असा आहे. सदर आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by RAMCHANDRA KONDIBA DHANAWADE
Date: 2025.03.18 17:49:36 +05'30'

(रामचंद्र धनावडे)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

उप आयुक्त(पुरवठा), छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर याच्यांमार्फत-
श्री. विलास तुकाराम मुसळे, सहायक जिल्हा पुरवठा अधिकारी, परभणी.

**प्रत :-**

१) मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३) विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर.
४) जिल्हाधिकारी, परभणी.

५) उप आयुक्त (पुरवठा), छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर
६) जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी.
७) सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, अ.ना.पु.व ग्रा.सं.वि., मंत्रालय, मुंबई.
८) निवडनस्ती (ना.पु.१५.)